जलसंपदा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता व सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यासाठी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाची मान्यता घेणे संदर्भातील मार्गदर्शक सूचना

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग,
परिपत्रक क्र. : मजनिप्रा-२०११/(२४/२०११)/जसं(आस्था)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २१. ०९.२०११.

**परिपत्रक**

संदर्भ : १) शासनाचे शुध्दीपत्रक क्र. WRD-Restructuring/2009/(16/09)/WR(Est) Dt. 19.11.2010.
२) शासनाचे पत्र क्र. मजनिप्रा-२०११/(२४/२०११)/जसं(आस्था) दि. २९.४.२०११

जलसंपदा प्रकल्पांना प्रशासकीय मान्यता आणि सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यासाठी संदर्भ क्र. १ नुसार स्थापन करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीकडे (State Level Technical Advisory Committee) तसेच महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाकडे (मजनिप्रा) सादर करण्यात येत असलेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने संदर्भिय शासन पत्र क्र.२ अन्वये कार्यपध्दती नमूद करण्यात आली होती. सदर कार्यपध्दतीत सुस्पष्टता आणण्यासाठी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण अधिनियम, २००५ मधील कलम ११(च) मधील तरतूदीच्या अनुषंगाने दि.१ एप्रिल २०११ नंतर प्राप्त झालेल्या प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावाबाबत तसेच सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावाबाबत खालीलप्रमाणे सुधारित मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

**<u>मूळ प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव -</u>**

१. ज्या जलसंपदा प्रकल्पांची अंदाजित किंमत रु. २५ कोटी किंवा त्याहून अधिक आहे, त्या प्रकल्पांचे प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव पाटबंधारे विकास महामंडळांनी प्रथम राज्यस्तरीय

तांत्रिक सल्लागार समितीकडे तांत्रिक व आर्थिकदृष्टया छाननी करुन मान्यता (Techno-economical scrutiny and clearance) देण्यासाठी सादर करावेत. त्यानंतर राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी व मान्यतेसह सदर प्रस्ताव पाटबंधारे विकास महामंडळांनी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाकडे मजनिप्रा अधिनियम, २००५ मधील कलम ११ (च) अंतर्गत आढावा व मान्यतेसाठी (Review & Clearance) सादर करावेत. या दोन मान्यता प्राप्त झाल्यानंतर सदर प्रस्ताव महामंडळांनी राज्य शासनाकडे प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करावेत.

२. ज्या जलसंपदा प्रकल्पांची अंदाजित किंमत रु.२५ कोटीपेक्षा कमी आहे, त्या प्रकल्पांच्या प्रशासकीय मान्यतेसाठीच्या प्रस्तावास राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीची छाननी व मान्यता आवश्यक नसल्याने असे प्रस्ताव पाटबंधारे विकास महामंडळांनी महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाकडे आढावा व मान्यतेसाठी सादर करावेत. प्राधिकरणाच्या मान्यतेनंतर सदर प्रस्ताव महामंडळांनी राज्य शासनाकडे प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करावेत.

**<u>सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी प्रकल्पांच्या व्याप्तीतील बदल (मजनिप्राच्या मान्यतेसंदर्भात) -</u>**

३. मूळ प्रशासकीय मान्यताप्राप्त प्रकल्पामध्ये बदल करुन सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव सादर करण्यात येत असल्यास महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाच्या मान्यतेसंदर्भात खालील निकष पूर्ण करीत असल्यास प्रकल्पांच्या व्याप्तीमधील बदल समजला जाईल:

अ) पाणीसाठा, पाण्याचा वापर व कालव्यांची लांबी यामध्ये वाढ झाल्यामुळे मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्पांकरिता सिंचन लाभक्षेत्रात (ICA) २० टक्केपेक्षा जास्त वाढ झाली असल्यास व मोठया पाटबंधारे प्रकल्पांकरिता सिंचन लाभक्षेत्रात (ICA) १० टक्केपेक्षा जास्त वाढ झाली असल्यास ;

किंवा

ब) पिक रचना व पाणी वाटपातील बदलांमुळे मध्यम व लघु पाटबंधारे प्रकल्पांकरिता सिंचन क्षमतेत (IP) २० टक्केपेक्षा जास्त वाढ झाली असल्यास व मोठया पाटबंधारे प्रकल्पांकरिता सिंचन क्षमतेत (IP) १० टक्केपेक्षा जास्त वाढ झाली असल्यास ;

४.	वरील परिच्छेद क्र. ३ मध्ये नमूद केलेल्या निकषापेक्षा व्याप्तीमधील बदल कमी असल्यास किंवा नियोजित सिंचन लाभक्षेत्र (ICA) / सिंचन क्षमतेत (IP) घट असल्यास महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाच्या मान्यते संदर्भात प्रकल्पांच्या व्याप्तीतील बदल समजला जाणार नाही.

**<u>व्याप्तीत बदल नसलेले सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव -</u>**

५.	ज्या जलसंपदा प्रकल्पांची अंदाजित किंमत रु. २५ कोटी किंवा त्याहून अधिक आहे व त्याचबरोबर त्यांच्या व्याप्तीत परिच्छेद क्र. ३, ४ मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार बदल नाही, अशा प्रकल्पांचे सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव पाटबंधारे विकास महामंडळांनी प्रथम राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीकडे तांत्रिक व आर्थिकदृष्टया छाननी करुन मान्यता देण्यासाठी सादर करावेत. त्यांच्या मान्यतेनंतर सदर प्रस्ताव महामंडळांनी राज्य शासनाकडे सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करावेत.

६.	ज्या जलसंपदा प्रकल्पांची अंदाजित किंमत रु. २५ कोटी पेक्षा कमी आहे व त्याचबरोबर त्यांच्या व्याप्तीत परिच्छेद क्र. ३, ४ मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार बदल नाही, अशा प्रकल्पांचे सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव पाटबंधारे विकास महामंडळांनी थेट राज्य शासनाकडे मान्यतेसाठी सादर करावेत.

७.	वरील परिच्छेद क्र. ५ व ६ मध्ये नमूद केलेले प्रस्ताव महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरणाकडे मान्यतेसाठी सादर करण्याची आवश्यकता नाही.

**<u>व्याप्तीत बदल असलेले सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्ताव -</u>**

८.	ज्या जलसंपदा प्रकल्पांची अंदाजित किंमत रु.२५ कोटी किंवा त्याहून अधिक असून त्यांच्या व्याप्तीत परिच्छेद क्र. ३, ४ मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार बदल आहेत, अशा प्रकल्पांच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्तावाबाबतीत परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद केलेली कार्यपध्दती अंमलात आणावी.

९.	ज्या जलसंपदा प्रकल्पांची अंदाजित किंमत रु.२५ कोटीपेक्षा कमी असून त्यांच्या व्याप्तीत परिच्छेद क्र. ३, ४ मध्ये नमूद केलेल्या निकषानुसार बदल आहेत, अशा प्रकल्पांच्या

सुधारित प्रशासकीय मान्यतेचे प्रस्तावाबाबतीत परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद केलेली कार्यपध्दती अंमलात आणावी.

**सर्वसाधारण सूचना -**

१०. जलसंपदा प्रकल्पांचे मूळ प्रशासकीय मान्यता आणि सुधारित प्रशासकीय मान्यता साठीचे प्रस्ताव हे राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समिती तसेच मजनिप्रा यांनी मान्यता दिलेल्या प्रकल्पाच्या प्रमुख वैशिष्ठांशी अनुरुप असावेत. प्रकल्पांस मूळ प्रशासकीय मान्यता किंवा सुधारित प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर, त्यामधील मंजूर प्रकल्प पाणीसाठा किंवा प्रकल्पापासून मिळणाऱ्या लाभांवर परिणाम होतील असे प्रकल्प वैशिष्ठामधील बदल प्रकल्प अधिकाऱ्यांनी शासनाच्या मान्यतेशिवाय करु नयेत.

उपरोक्त मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०११०९२१११४६५५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( हि. ता. मेंढेगिरी )**
**मुख्य अभियंता (जसं) व सह सचिव**

**प्रति,**

प्रधान सचिव (जसं), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई.
महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा, नाशिक.
महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था, औरंगाबाद.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे.
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक

मुख्य अभियंता, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधनी, नाशिक.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, जलसंपदा विभाग, नाशिक.
मुख्य अभियंता व मुख्य प्रशासक, लाक्षेवि, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, जलविकास केंद्र, वाल्मी परिसर, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, अमरावती
मुख्य अभियंता (विप्र), जलसंपदा विभाग, अमरावती
मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
मुख्य अभियंता, (विप्र), जलसंपदा विभाग, पुणे.
मुख्य अभियंता, (स्थापत्य), जलविद्युत प्रकल्प, पुणे.
मुख्य अभियंता, जलविद्युत प्रकल्प (विद्युत) मुंबई.
मुख्य अभियंता, यांत्रिकी संघटना नाशिक.
मुख्य अभियंता, कोकण प्रदेश, मुबई.
सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
सर्व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
जसं(आस्था) कार्यासन, संग्रहार्थ.